**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
विस्तार इमारत, सातवा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.

**Government of Maharashtra**
General Administration Department, Mantralaya,
Annexe Building, Seventh floor,
Madame Cama Road,Hutatma Rajguru Chowk,
Mumbai 400 032.

☎ 022- 22794179

क्रमांक : डीसीए १११६/ प्र. क्र.१४१/२८-अ दिनांक:- २५ फेब्रुवारी, २०२२

**विषय -: विमानचालन संचालनालयाचे जुहू विमानतळावरील हँगर क्र.६ च्या (रु.७,२१,११३/- + अनुज्ञेय कर) वाढीव भाड्यास मंजूरी देण्याबाबत...**

**संदर्भ:-** ज्ञापन समक्रमांकित दिनांक १८ मार्च,२०२१

**ज्ञापन -:**

संदर्भाधीन ज्ञापनान्वये विमानचालन संचालनालयाचे जुहू येथील कार्यालयाकरीता एप्रिल,२०२० पासून दरमहा रु.७,२१,११३/- + अनुज्ञेय कर इतके भाडे अदा करण्यास शासनाची मंजूरी देण्यात आली होती. सदर दिनांक १८/३/२०२१ चे ज्ञापन अधिक्रमित करण्यात येत असून,आता अधिदान व लेखा अधिकारी यांना कळविण्यात येते की, विमानचालन संचालनालयाच्या जुहू हँगर क्र.६ येथे स्थित असलेल्या कार्यालयाच्या भाड्यात भारतीय विमानपत्तन प्राधिकरणाने सन २०२०-२१ करीता वाढ केली आहे. यास्तव सदर कार्यालयासाठी एप्रिल, २०२० पासून दरमहा रु. ७,२१,११३/- (अक्षरी रूपये सात लाख एकवीस हजार एकशे तेरा फक्त ) इतके भाडे + अनुज्ञेय कर अदा करण्यास सदर ज्ञापनाद्वारे मंजूरी देत आहे.

२. या प्रित्यर्थचा खर्च खाली नमूद केलेल्या लेखीशीर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा .

मागणी क्र. ए-४
२०७०- इतर प्रशासनिक सेवा
( ११४ ) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण
(००) (०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन
(२०७००१५६) १४- भाडेपट्टी व कर

३. सदर बाबीसाठी संचालक विमानचालन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी व उपसंचालक, विमानचालन संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर ज्ञापन शासन निर्णय वित्त विभाग विअप्र २०१३/ प्र.क्र. ३०/२०१३/ विनियम, भाग-२ दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला उपविभाग (एक) अनुक्रमांक १० नियम ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५ मधील नियम १४७ ( क) खाली टीप-१ अन्वये प्रशासनिक विभागांना प्राप्त झालेल्या प्राधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२२०२२५१७०३०११३०७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahesh Kisan Wavhal

Digitally signed by Mahesh Kisan Wavhal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, serialNumber=495c75b4c173c81f308bd63a1b33a5da4ea131ed182d44ea1b502ab4662e9810, cn=Mahesh Kisan Wavhal
Date: 2022.02.25 17:05:43 +05'30'

**( म. कि. वाव्हळ )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.

२. उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
३. महाव्यवस्थापक (एल.एम.) भारतीय विमानपत्तन प्राधिकरण, नागरी विमानक्षेत्र, जुहू, मुंबई-५४
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. निवड नस्ती.